**२७ HP पेक्षा जास्त परंतु २०१ HP पेक्षा कमी जोडभार असलेल्या यंत्रमागांना प्रती यूनिट रु.०.७५ अतिरीक्त वीज सवलत तसेच २७ HP पेक्षा कमी जोडभार असलेल्या यंत्रमागांना रु.१.०० अतिरीक्त वीज सवलत लागू करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्र. धोरण २०१८/प्र.क्र.१६४९/टेक्स-५**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक :- १५ मार्च, २०२४**

**वाचा :-**
१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र: धोरण २०१७/प्र.क्र.०६/टेक्स-५, दि.१५ फेब्रुवारी, २०१८.
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र: धोरण २०१८/प्र.क्र.१६४९/टेक्स-५, दि.२१ डिसेंबर, २०१८.
३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र: धोरण २०१८/प्र.क्र.१६४९/टेक्स-५, दि.१३ सप्टेंबर, २०१९.
४) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र: धोरण २०२३/प्र.क्र.८१/टेक्स-५, दि.०२ जून २०२३.
५) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र: धोरण २०२३/प्र.क्र.८१-अ/टेक्स-५, दि.१२ डिसेंबर, २०२४ व दि.०६ मार्च २०२४.

**<u>प्रस्तावना :-</u>**

वस्त्रोद्योगामध्ये कृषि क्षेत्रानंतर सर्वात जास्त रोजगार निर्मितीची क्षमता आहे. त्यामुळे प्रत्येक राज्य आपल्या राज्यात वस्त्रोद्योग क्षेत्रामध्ये गुंतवणूक आकर्षीत करण्यासाठी वस्त्रोद्योग क्षेत्राच्या विकासासाठी सोयी-सुविधा व प्रोत्साहने पुरवित असते. वस्त्रोद्योगात कमी गुंतवणूकीत अधिक रोजगार निर्मीतीची क्षमता आहे. ही बाब विचारात घेऊन मंत्रिमंडळाने दि. ०६.०२.२०१८ रोजी झालेल्या बैठकीत वस्त्रोद्योग धोरण २०१८-२३ ला मान्यता दिली आहे. त्यानुसार दि.१५.०२.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये वस्त्रोद्योग धोरण, २०१८-२३ घोषीत करण्यात आले आहे. या धोरणातील परि. ७.११.७ मध्ये २७ HP पेक्षा कमी दाबाच्या यंत्रमाग धारकाचे प्रति युनिट वीज दर हे २७ HP पेक्षा जास्त परंतु २०१ HP पेक्षा कमी दाबाच्या युनिट धारकापेक्षा जास्त दिसते. ती विसंगती दूर करण्यासाठी आवश्यक ती उपाययोजना करण्यात येईल, असे घोषीत करण्यात आले होते. त्या

अनुषंगाने शासन निर्णय दि.२१ डिसेंबर,२०१८ नुसार २७ HP पेक्षा कमी व २७ HP व त्यापेक्षा जास्त जोडभार असलेल्या यंत्रमाग धारकाच्या वीज दरातील विसंगती दूर करण्याच्या दृष्टीने २७ HP पेक्षा कमी दाबाच्या यंत्रमाग घटकांना रु. ३.७७ प्रति युनिट व २७ HP व त्यापेक्षा जास्त परंतु २०१ HP पेक्षा कमी जोडभार असलेल्या यंत्रमाग घटकांना रु.३.०० प्रति युनिट वीजदर सवलत लागू करण्यात आली आहे. सदर धोरण घोषीत झाल्यानंतर २७ HP पेक्षा जास्त परंतु २०१ HP पेक्षा कमी जोडभाराच्या यंत्रमाग धारकांनी तसेच त्यांच्या संघटनानी त्यांना अतिरीक्त रु.१.२२ वीज सवलत पुन्हा लागू करणेबाबत शासनाला निवेदने सादर केली आहेत. त्याअनुषंगाने शासन निर्णय दि.१३/०१/२०१९ अन्वये या प्रकल्पांना अतिरीक्त रू.०.४० ची वीज सवलत लागू केली आहे. अशा प्रकारे २७ HP पेक्षा जास्त परंतु २०१ HP पेक्षा कमी जोडभार असलेल्या यंत्रमागांना सद्यस्थीतीत रू. ३.४० प्रती यूनिट वीज सवलत लागू आहे. तसेच दि.२१.१२.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये २७ HP पेक्षा कमी जोडभार असलेल्या यंत्रमाग धारकांना रु.३.७७ प्रतीयुनिट वीज सवलत लागू केली आहे. तदनंतर, २७ HP वरील यंत्रमागांसाठी वीज दरात प्रति युनिट रु.०.७५ च्या अतिरिक्त सवलतीसह २७ HP खालील यंत्रमागासाठी प्रति युनिट रु.१.०० अतिरिक्त वीज सवलत लागू करणेबाबतची विनंती यंत्रमाग घटक तसेच लोकप्रतिनिधींनी केली आहे. त्यानुसार २७ HP पेक्षा जास्त परंतु २०१ HP पेक्षा कमी जोडभार असलेल्या यंत्रमाग घटकांना प्रती यूनिट रु.०.७५ तसेच २७ HP पेक्षा कमी जोडभार असलेल्या यंत्रमाग घटकांना प्रती यूनिट रु.१.०० अतिरीक्त वीज सवलत लागू करण्याचा प्रस्ताव दिनांक ११ मार्च, २०२४ रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीत सादर करण्यात आला होता. सदर बैठकीमध्ये सदर विषयाबाबत झालेल्या निर्णयाच्या अनुषंगाने २७ HP पेक्षा जास्त परंतु २०१ HP पेक्षा कमी जोडभार असलेल्या यंत्रमागांना प्रती यूनिट रु.०.७५ तसेच २७ HP पेक्षा कमी जोडभार असलेल्या यंत्रमागांना प्रती यूनिट रु.१.०० अतिरीक्त वीज सवलत लागू करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय:-</u>**

वरील प्रस्तावनेमध्ये नमूद केल्यानुसार २७HP पेक्षा जास्त परंतु २०१ HP पेक्षा कमी जोडभार असलेल्या यंत्रमागांना तसेच २७ HP पेक्षा कमी जोडभार असलेल्या यंत्रमागांना खालीलप्रमाणे अतिरिक्त वीज सवलत लागू करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे :-

१. २७HP पेक्षा जास्त परंतु २०१ HP पेक्षा कमी जोडभार असलेल्या यंत्रमागांना प्रती युनिट रू.०.७५ अतिरीक्त वीज सवलत लागू करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. २७ HP पेक्षा कमी जोडभार असलेल्या यंत्रमागांना प्रती युनिट रू.१.०० अतिरीक्त वीज सवलत लागू करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर वीज सवलत २७ HP पेक्षा कमी जोडभार असलेल्या यंत्रमागांना तसेच २७HP पेक्षा जास्त परंतु २०१ HP पेक्षा कमी जोडभार असलेले जे यंत्रमाग उद्योग वस्त्रोद्योग विभागाकडे नोंदणी करतील व त्यांना मान्यता प्राप्त होईल अशाच यंत्रमाग उद्योगांना लागू राहील.

४. २७ HP पेक्षा जास्त परंतु २०१ HP पेक्षा कमी जोडभार असलेल्या यंत्रमाग घटकांना प्रती यूनिट रु.०.७५ तसेच २७ HP पेक्षा कमी जोडभार असलेल्या यंत्रमाग घटकांना प्रती यूनिट रु.१.०० अतिरीक्त वीज सवलत सदर शासन निर्णय निर्गमीत झाल्याच्या दिनांकापासून एकात्मिक व शाश्वत वस्त्रोद्योग धोरण, २०२३-२८ च्या कालावधीपर्यंत लागू असेल.

२. सदर शासन निर्णय दिनांक ११ मार्च, २०२४ रोजीच्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनौसं क्र.२२९/२०२४/व्यय-२, दि.१५.०३.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१५१९५७०८१४०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHRIKRISHNA BABURAO PAWAR

Digitally signed by SHRIKRISHNA BABURAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=631cf5e4544a7032340c686106b15138df3ef3b889e86fb2026c1add12d27e41, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2FAFF40BB05D156355556F7264A3A59AD12DD42F183422309976C41CE28C0A1D, cn=SHRIKRISHNA BABURAO PAWAR
Date: 2024.03.15 20:06:41 +05'30'

**( श्रीकृष्ण पवार )**
**(उप सचिव, महाराष्ट्र शासन)**

**प्रत-**

१. मा. राज्यपाल, यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री (गृह, विधि व न्याय), महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय मुंबई.
४. मा. उपमुख्यमंत्री (वित्त), महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय मुंबई.
५. मा. मंत्री (सर्व), महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई.
६. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
७. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
८. मा. खासदार (सर्व) महाराष्ट्र राज्य.
९. मा. आमदार (सर्व) महाराष्ट्र राज्य.
१०. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
११. प्रधान सचिव, (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय मुंबई.
१२. सचिव, (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग मंत्रालय मुंबई
१३. सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
१४. आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर,

१५. संचालक (रेशीम), रेशीम संचालनालय, नागपूर.

१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

१७. महालेखापाल (लेखा व लेखा अनुज्ञेयता/लेखा परिक्षा महाराष्ट्र राज्य १/२, मुंबई, नागपूर

१८. व्यवस्थापक, टफ सेल मधिल सर्व बँका (ई-मेलद्वारे).

१९. वस्त्रोद्योग विभागातील सर्व कार्यासने.

२०. निवड नस्ती (कार्यासन टेक्स-५).